कल्चरल एज्युकेशन सोसायटी, नागपूर संचलित कायंदे प्राथमिक व उच्च प्राथमिक शाळा, बडकस चौक, ता.जि.नागपूर शाळेचे गांधी पुतळा, इतवारी रोड, ता.जि.नागपूर येथे केलेल्या स्थलांतरास कार्योत्तर मान्यतेबाबत.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन निर्णय क्रमांकः प्राशास्थ ३२१८/प्र.क्र.४१५/एसएम-१
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०९ नोव्हेंबर, २०२०

**वाचा :-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांकः माशास्थ २०१२/(५९/१२)माशि-२, दिनांक ३१ जुलै, २०१३.

**संदर्भ :-** विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर यांचे क्र.प्राथ/ब/६८४३/२०१७, दिनांक १८ ऑगस्ट, २०१७ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

कल्चरल एज्युकेशन सोसायटी, नागपूर संचलित कायंदे प्राथमिक व उच्च प्राथमिक शाळा, बडकस चौक, ता.जि.नागपूर या मराठी माध्यमाच्या अनुदानित प्राथमिक शाळेचे गांधी पुतळा, इतवारी रोड, ता.जि.नागपूर येथील स्थलांतरास कार्योत्तर मान्यता देण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शाळेची इमारत धोकादायक झाल्याने विद्यार्थ्यांचे जिवित व शैक्षणिक नुकसान होऊ नये यासाठी संस्थेने स्वत:च्या इमारतीमध्ये स्थलांतर केले आहे. सदर स्थलांतरास खालील अटी व शर्तीवर मान्यता देण्यात येत आहे. :-

(१) स्थलांतरीत शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही.

(२) शासनाकडून शाळा, शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ.संदर्भात वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ.चे पालन संस्थेने करणे आवश्यक राहील.

(३) स्थलांतरीत शाळेच्या बाबतीत मुळ शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तींमध्ये बदल होणार नाहीत.

(४) सदर शाळा मुळ ठिकाणी अनुदानाच्या ज्या तत्वावर कार्यरत होती, त्याच तत्वावर स्थलांतरीत ठिकाणी कार्यरत राहील.

(५) शासन निर्णय, दिनांक २८/०८/२०१५ मधील संचमान्यतेच्या सुधारीत निकषांनुसार तसेच, शाळांबाबत शासनाकडून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या आदेशानुसार अनुज्ञेय होणाऱ्या पदांइतके शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी कार्यरत राहतील व त्यापेक्षा जास्त शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी कार्यरत

राहणार नाहीत, हे संस्थेवर बंधनकारक राहील तसेच, अनुज्ञेय पदांपैकी रिक्त पदे अतिरिक्त कर्मचाऱ्यांमधून भरण्याबाबत शासनाच्या धोरणानुसार कार्यवाही करणे अनिवार्य राहील.

(६) सदरहू स्थलांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी वा आक्षेप आल्यास किंवा स्थलांतरासंदर्भातील अटींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास स्थलांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

(७) भविष्यात शासन मान्यतेशिवाय शाळेचे स्थलांतर करण्यात येणार नाही, याबाबत संस्थेने दक्षता घ्यावी.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर यांनी सदर शाळेच्या स्थलांतरास मान्यता देण्याबाबत ४ आठवडयात पुढील कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०११०९१२३३२८६०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad4976f306de2810214ec2ea330d9daea59f1d3f45fae9227a3feaa541af10d1, serialNumber=dc78036626ec580d66c0ac502d43af5f670b5ba13f51213ad071acd53714a284, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2020.11.09 12:38:47 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर
३) शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, नागपूर
४) अध्यक्ष/ सचिव, कल्चरल एज्युकेशन सोसायटी, नागपूर
५) निवडनस्ती ( एसएम-१).